**निवडसूची सन २०२४२-५**

**उप संचालक भूमि अभिलेख, गट-अ संवर्गामध्ये पदोन्नती देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश : क्रमांक ,पदोन्न-१०२४/प्र.क्र.४२२/ई-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
दिनांक : ०३ एप्रिल, २०२५

**शासन आदेश:-**

भूमि अभिलेख विभागातील सन २०२४-२५ या निवडसूची वर्षात जिल्हा अधीक्षक भूमि अभिलेख, गट-अ या संवर्गातून उप संचालक भूमि अभिलेख, गट-अ या संवर्गामध्ये पदोन्नती देण्यासाठी सेवाज्येष्ठतेनुसार, तात्पुरत्या स्वरुपातील पदोन्नतीसाठी पात्र ठरलेल्या खालील अधिकाऱ्यास विहीत अटींच्या अधीन राहून **उप संचालक भूमि अभिलेख, गट-अ (वेतनश्रेणी एस-२३, रु.६७,७००-२,०८,७००)** या संवर्गामध्ये तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत असून पदोन्नतीनंतर त्यांची स्तंभ क्र.५ मध्ये दर्शविण्यात आलेल्या ठिकाणी पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र | अधिकाऱ्यांचे नाव | दि.१.१.२०२४ रोजीच्या ज्येष्ठता यादीतील ज्ये.क्र. | जात प्रवर्ग | पदस्थापना |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्री.महेश मधुकर खडतरे | १३ | अ.जा. | प्रपत्र बढती - "विशेष कार्य अधिकारी, मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई" |

**.२** महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियम ४०, परि.२, अट क्र.१८ नुसार तात्पुरत्या स्वरुपात प्रपत्र बढती (पदोन्नती) देण्यात येत आहे. सदर तरतुदीनुसार प्रपत्र बढतीचा कालावधी हा आदेशाच्या दिनांकापासून ६ महिन्यांचा राहील. त्यानंतर श्री.खडतरे यांनी मुळ विभागात रुजू होणे आवश्यक राहील.

**३.** वर नमूद अधिकाऱ्यांना खालील अटींच्या अधीन राहून पदोन्नती देण्यात येत आहे.

**अ)**मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी रिट याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दि.०४.०८.२०१७ रोजी दिलेला न्यायनिर्णयाविरुध्द शासनाने मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अधीन राहून पदोन्नतीच्या कोट्यातील सर्व रिक्त पदे दि.२५.०५.२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात भरण्याबाबत सामान्य

प्रशासन विभाग/ कार्यासन १६-ब च्या दि.०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयान्वये दिलेल्या सूचनांनुसार पदोन्नतीस मान्यता देण्यात येत आहे. तसेच शासन निर्णय, दिनांक ०७.०५.२०२१ प्रकरणी मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे आव्हान देण्यात आलेले असून त्यामधील अंतीम निर्णयाच्या अधीन राहून सदर मान्यता देण्यात येत आहे.

**आ**) सदरची पदोन्नती अत्यंत तात्पुरत्या स्वरुपात प्रशासकीय निकड म्हणून लोकहितास्तव देण्यात आली आहे.

**इ**) सदर पदोन्नती ही उप संचालक भुमि अभिलेख (गट-अ) संवर्गाच्या अंतिम ज्येष्ठतेच्या व त्यामध्ये होणाऱ्या बदलांच्या अधीन राहील. या पदोन्नतीमुळे वरील अधिकाऱ्यांना सदर पदोन्नतीच्या दिनांकापासून ज्येष्ठतेचा हक्क मागता येणार नाही.

**ई**) या पदावर देण्यात आलेली पदोन्नती (निवडसूची) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेने नियमित केल्यानंतरच सदर पदावर सेवाज्येष्ठता व अन्य सेवाविषयक लाभ मिळण्यास पदोन्नत अधिकारी पात्र ठरतील.

**उ**) सदर पदोन्नती, कोणतीही पूर्वसूचना किंवा नोटीस न देता रद्द करण्याचा अधिकार शासन राखून ठेवत आहे.

**४.** पदोन्नती झालेल्या अधिकाऱ्यांनी उप संचालक भूमि अभिलेख, गट-अ या पदाचा कार्यभार ग्रहण केल्यानंतर त्या अधिकाऱ्यांची शासनाने वेळोवेळी विहित केलेल्या नियमानुसार वेतन निश्चिती करावी.

**५.** सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२५०४०३१८५१४५४५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by ASHWINI BHIMRAO YAMGAR
Date: 2025.04.03 18:55:01 +05'30'

**(अश्विनी यमगर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:**
जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख (म.रा.), पुणे.

**प्रत:-**

१) मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२.
२)स्वीय सहायक,अप्पर मुख्य सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
३) सर्व उपसंचालक भूमि अभिलेख.
४)महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
५)अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
६) श्री.महेश मधुकर खडतरे, जिल्हा अधीक्षक भूमि अभिलेख.
७) कार्यासन ई-६ संग्रहार्थ.